**सुवर्ण जयंती शहरी रोजगार योजनेची**
**रक्कम वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय** क्र.सुजयो २००९/प्र.क्र.१४८/नवि-१६
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२. दिनांक १० फेब्रुवारी, २०१०

**संदर्भः-** १) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.वानियो-१००९/प्र.क्र.४६/नवि-४, दिनांक ७ जुलै, २००९
२) केंद्र शासनाचे पत्र क्र.जी २४०११/१/२००९-युपीए-१, दि.२० जुलै,२००९
३) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.सुजयो-२००९/प्र.क्र.१४८/नवि-१६, दिनांक २८ जुलै, २००९ व दिनांक २८ ऑक्टोबर, २००९
४) केंद्र शासनाचे पत्र क्र.जी २४०११/१/२००९-युपीए/३२, दि.४ जानेवारी,२०१०
५) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.सुजयो/केंद्र शासन निधी/२००९-१०/प्र.क्र.६०१/का.१७, दि.१६/१/२०१० चे पत्र

**शासन निर्णय :-** उपरोक्त संदर्भ क्र.२ येथील दिनांक २० जुलै, २००९ च्या पत्रान्वये सुवर्ण जयंती शहरी रोजगार योजनेसाठी सन २००९-१० या आर्थिक वर्षातकरिता प्रथम टप्पा म्हणून केंद्र शासनाने रु.४०,३७,९८,०००/- इतके अनुदान वितरीत करण्यात आले होते. केंद्र शासनाने वितरीत केलेल्या अनुदानाच्या प्रमाणात राज्य शासनाचा २५% हिस्सा म्हणून उपरोक्त संदर्भ क्र. ३ येथील समक्रमांकाचे दि.२८ जुलै, २००९ व दि.२८ ऑक्टोंबर, २००९ च्या शासन निर्णयान्वये अनुक्रमे रु.९,३०,५९,०००/ व रु ४,१५,४१,०००/- असे एकुण रु.१३,४६,००,०००/- इतके अनुदान वितरीत केलेले आहे. संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये केंद्र शासनाने दुसऱ्या टप्प्यात रु.४०,३७,९८,०००/- इतके अनुदान वितरीत केले आहे.

०२. उपरोक्त संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये केंद्र शासनाने वितरीत केलेल्या अनुदानाच्या प्रमाणात राज्य शासनाचा २५% हिस्सा म्हणून संदर्भ क्र.५ येथील पत्रान्वये मागणी केल्याप्रमाणे रु.१३,४६,००,०००/- (रुपये तेरा कोटी शेहचाळीस लाख फक्त) इतके अनुदान आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांना वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

०३. उपरोक्त निधी वितरीत करण्यासाठी **सहाय्यक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत असून आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांना "नियंत्रक**

**अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.** त्यांनी सदर रक्कमेचे देयक अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथे सादर करुन धनादेश प्राप्त करुन घ्यावा.

०४. या प्रयोजनासाठी होणारा खर्च "मागणी क्र.एफ-३, "२२३० कामगार व सेवायोजन-०२, सेवायोजन, १०१ सेवायोजन सेवा पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२) सुवर्ण जयंती शहरी रोजगार योजना (०२) (०१) राज्य योजना (२२३०१२३२) ३१, सहायक अनुदाने" या लेखाशिर्षाखालील सन २००९-१० च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

०५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनुक्रमे अनौ.संदर्भ क्र.५२/२०१०/व्यय-३, दिनांक २८/१/२०१० तसेच अनौपचारिक संदर्भ क्रमांक:१८७/१०/अर्थसंकल्प-१६, दिनांक ९/२/२०१० अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( आय.एम. मोरे )
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई ४०० ०२५
महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
मुख्य लेख परिक्षा अधिकारी, मुंबई
मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
मा.मुख्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
मा.राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
अवर सचिव/कक्ष अधिकारी(नवि-४)/लेखा अधिकारी (नवि-३१), नगर विकास विभाग
निवड नस्ती नवि-१६

---------